**श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तिर्थस्थळ विकास आराखडयातील कामासाठी रुपये २५.०० कोटी इतका निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २८.०३.२०२५

वाचा :-१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६, दि.१३ मार्च, २०२३.
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-२०२३/प्र.क्र.५०८/नवि-१६, दि.०६ जुलै, २०२३.
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६, दि.१९ डिसेंबर, २०२३
४) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-२०२३/प्र.क्र.५०८(भाग-१) /नवि-१६ (ई-७१९४०८), दि.०८ जानेवारी, २०२४.
५) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६, दि.२७ फेब्रुवारी, २०२४
६) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-२०२४/प्र.क्र.३२०/नवि-१६, दि.१६ डिसेंबर, २०२४
७) महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. का.अ.(प्रकल्प-२)/ १४२२ दि. ३१ जानेवारी २०२५

**प्रस्तावना :**

श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडयांतर्गत रु.१४०.७६ कोटी इतक्या किंमतीचा टप्पा-३ व रु.७४.१७ कोटी इतक्या किंमतीचा टप्पा-४ अशा एकूण रु.२१४.९४ कोटी किंमतीच्या आराखडयास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानंतर टप्पा-३ व टप्पा-४ चे एकत्रिकरण करुन, आराखड्याच्या किंमतीत बदल न करता, रु. २१४.९४ कोटी किंमतीच्या नविन/सुधारीत १६ कामांचा (Scope of work) समावेश असलेल्या तीर्थक्षेत्र विकास आराखड्यास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडयास टप्पा-३ व ४ अंतर्गत प्रस्तावित कामांसाठी (२२१७ A०११) या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०२३-२०२४ करीता एकूण रु.५०.०० कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे.

३. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी श्री. महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडयास टप्पा-३ व ४ अंतर्गत प्रस्तावित कामांसाठी सन २०२४-२०२५ करीता १४४.९४ कोटी इतका निधी उपलब्ध करुन संदर्भ क्र. ७ वरील प्रस्तावाद्वारे विनंती केली होती. सदर कामांसाठी वर्ष २०२४-२५ करिता लेखाशिर्ष (२२१७ A०११) अंतर्गत मूळ अर्थसंकल्पीय तरतूद रु.२०.००

कोटी असून ती नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने दि.१६.१२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये संपूर्णत: वितरित करण्यात आली आहे. त्यानुसार श्री. महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडयास टप्पा-३ व ४ अंतर्गत प्रस्तावित कामांसाठी आतापर्यंत एकूण रु.७०.०० कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे.

मार्च २०२५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात सदर कामांकरिता रु. २५.०० कोटी इतक्या रकमेची पुरक मागणी मंजूर करण्यात आली असून (२२१७ A०११) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु.४५.०० कोटी इतक्या रकमेचे सुधारित अंदाज मान्य करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने सदर निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास सादर करण्यात आला होता. त्यास अनुसरुन सदर कामांसाठी रु.२५.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडयास टप्पा-३ व ४ अंतर्गत प्रस्तावित कामांसाठी रू.२५.०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडयांतर्गत टप्पा-३ व टप्पा-४ करीता सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** मध्ये नमुद कामांसाठी रुपये २५.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णय, दि.१९ डिसेंबर, २०२३ अन्वये आराखडयाकरिता निश्चित करण्यात आलेल्या अटी व शर्ती कायम राहतील.

२. सदर आराखडयातील कामांसाठीचा खर्च नगर विकास विभागाच्या लेखाशीर्षांतर्गत "(००)(११) श्री महालक्ष्मी जंगदबा संस्थान कोराडी, जि. नागपुर या तीर्थस्थळ विकास आराखडयाच्या अंमलबजावणीसाठी नागपूर सुधार प्रन्यासला सहाय्य (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१७ A०११)" या लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

३. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी जिल्हाधिकारी, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आराखडयातील कामांकरीता उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांना वितरीत करण्याची जबाबदारी संनियंत्रण अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, नागपूर यांची राहील

४. आहरण व संवितरण अधिकाऱ्याने सदर आहरीत करण्यात येणारा निधी तात्काळ वितरीत करावा. सदरचा निधी दिनांक ३१ मार्च, २०२५ अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी.

५. शासन निर्णय, दि.१९ डिसेंबर, २०२३ मधील अटी व शर्तीनुसार वितरीत रुपये २५.०० कोटीमधून परिशिष्ट-अ मध्ये नमुद कामांच्या अंदाजपत्रकांना सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी किंवा घेण्यात आल्याची खात्री करावी.

६. सदर निधी ज्या कामासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच कामासाठी वापण्याची दक्षता घ्यावी. तसेच योजनेसंदर्भात निधीच्या खर्चाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे विहित कालमर्यादेत शासनास सादर करावीत.

७. जिल्हाधिकारी, नागपूर यांनी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७ मार्च २०२५ मधील विहित अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याबाबत खातरजमा करावी.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांच्याकडील अनौपचारिक संदर्भ क्र.१२६/२०२५, दि.२६.०३.२०२५ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्याकडील अनौपचारिक संदर्भ क्र.१७६/२०२५, दि.२८.०३.२०२५ यांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१४२९००६४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.03.28 14:30:47 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत (आवश्यक व तातडीच्या कार्यवाहीसाठी ) :** उपसचिव (नवि-१६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री, विधी व न्याय  तथा पालकमंत्री, नागपूर यांचे खाजगी सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
४. नागपूर जिल्हयातील संबंधित संसद सदस्य, विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त/नियोजन/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
९. विभागीय आयुक्त, नागपूर.
१०. जिल्हाधिकारी, नागपूर.
११. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर
१२. निवडनस्ती (नवि-२६).

**परिशिष्ट - अ**

**(शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६,**

**दि.१९ डिसेंबर, २०२३ मधील कामांचे विवरणपत्र)**

| अ.क्र. | कामाचे विवरण | रक्कम रु. (लाखात) |
|---|---|---|
| १. | महाद्वार पुतळे - विद्यमान महाद्वारचा विस्तार, FRP मध्ये छत्रपती शिवाजी महाराज व आई तुळजाभवानीचा पुतळा. | ८५०६६१८६.०० |
| २. | कॅनल कंपाउंड वॉल - संरक्षण भिंत व त्यावर एमएस ग्रीलसह विद्यमान कालव्याच्या भिंतीचा विस्तार इत्यादी. | १५१३३३०३.०० |
| ३. | VIP महाद्वार - राजगड महाद्वार प्रत्येक बाजूला १० मी. लांब. | ३४४२०१५०.०० |
| ४. | शक्तीपीठ म्युरल्स - अस्तित्वात असलेल्या भिंतीवर ५२ शक्तीपीठ म्युरल्स (FRP). | १३०७१२४०.०० |
| ५. | मोनो रेल ७ स्थानकांसह २.५ कि.मी. जॉय ट्रेन. | १७४६३७३०४.०० |
| ६. | किड्स ॲडव्हेंचर पार्क - इनडोअर आणि आउटडोअर किड्स ॲडव्हेंचर गेम्स. | ३११८९१८४९.०० |
| ७. | मेरा भारत महान - FRP मध्ये भारतातील २९ राज्यांच्या इमारती आणि उंचीचे प्रदर्शन | २५३६५८६८०.०० |
| ८. | ॲम्युझमेंट पार्क क्षेत्र विकास: जमीन विकास, कार्ड पेव्हिंग स्टॅम्प कॉक्रीट इत्यादी. | ५७६४०३९०.०० |
| ९. | ॲम्युझमेंट पार्क कंपाउंड वॉल - काटेरी तार कंपाउंड वॉल. | ७२५८७५३.०० |
| १०. | ऍम्युझमेंट पार्क एंट्री गेट - टिकीट हाऊस. | ७५९३९५६.०० |
| ११. | ॲम्युझमेंट पार्क ब्रिज - वॉटर बॉडी आणि पुलाचे आकर्षण वैशिष्ट्य | १०८६३८१७.०० |
| १२. | डिनो पार्क | ८०३००४००.०० |
| १३. | ॲम्युझमेंट पार्क राइड्स | १८६९२५०७५.०० |
| १४. | MEP काम - इलेक्ट्रिकल, HVAC, अग्निशमन इत्यादी. | १८२२८७०५९.२० |
| १५. | १५१ फूट हनुमान मुर्ती | ११५००००००.०० |
| १६. | लॅंडस्केपिंग आणि वृक्षारोपन | २७७९५२७६.५४ |
| | विविध (रॉयल्टी आणि चाचणी शुल्क) इत्यादी. | ५३६२२७८.३५ |
| | **एकुण** | १५६८९०५७१७.०९ |
| | **आकास्मीकता ४ टक्के रु.** | ६२७५६२२८.६८ |
| | **वस्तु व सेवा कर (जी.एस.टी.) १८ टक्के रु.** | २८२४०३०२९.१० |
| | **नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण पर्यवेक्षक शुल्क (पीएमसी शुल्कासह) १० टक्के रु.** | १५६८९०५७१.७० |
| | **भाव वाढ ५ टक्के रु.** | ७८४४५२८५.८५ |
| | **एकूण रु.** | २१४९४००८३२.०० |

**आराखड्याची एकूण किंमत रु. २१४.९४ कोटी**